महाराष्ट्र आपत्कालीन वैद्यकिय सेवा प्रकल्पाकरीता सेवा पुरवठादाराची नेमणूक करण्याकरीता व सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन निर्णय, क्रमांकः ईएमएस -२०२३/प्र.क्र.०२/आरोग्य-३

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल संकुल इमारत,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : १५ मार्च, २०२४.

वाचा :

१) आरोग्य सेवा आयुक्तालय,मुंबई यांचे पत्र क्रमांक- ३२२७-२८/आसेआ/खरेदी कक्ष/१०८MEMS/२०२४, दि.०७.०३.२०२४

२) सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्र. ईएमएस -२०२३/प्र.क्र.०२/आरोग्य-३, दि.०४ ऑगस्ट,२०२३.

३) आरोग्य सेवा आयुक्तालय,मुंबई यांनी प्रसिध्द केलेली निविदा क्र.: **E-08/MEMS/23-24,** दि.०४ जानेवारी,२०२४

४) निविदा समितीच्या दि.०१.०३.२०२४ च्या बैठकीचे इतिवृत्त

५) मा.मंत्रीमंडळाचा निर्णय दिनांक- १३ मार्च,२०२४.

**प्रस्तावना:**

महाराष्ट्र आपत्कालीन वैद्यकिय सेवा प्रकल्पांतर्गत (टोल फ्री क्रमांक १०८) २५५ ॲडव्हान्स सर्पोटिंग रुग्णवाहिका (एएलएस) आणि १२७४ बेसीक लाईफ सपोर्टींग रुग्णवाहिका (बीएलएस) अशा एकूण १५२९ रुग्णवाहिका, तसेच नवजात अर्भक रुग्णवाहिका, बोट रुग्णवाहिका, मोटारबाईक रुग्णवाहिकेद्वारे आपत्कालीन सेवेकरीता सेवा पुरवठादाराची नेमणूक करण्याकरीता मा. मंत्रीमंडळाने दिनांक २१ जुलै, २०२३ रोजी दिलेल्या मान्यतेस अनुसरुन दि. ०४ ऑगस्ट, २०२३ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. याकरिता गठित करण्यात आलेल्या निविदा

समितीने उक्त शासन निर्णयाच्या अनुषंगाने तसेच सदर शासन निर्णयान्वये मंजूर केलेले दर हे केवळ अंदाजित व १० वर्ष जुन्या तांत्रिक निविर्देशानुसार असल्यामुळे तांत्रिक विनिर्देश अद्ययावत करुन व मूळ प्रशासकीय मान्यतेमध्ये मध्यवर्ती संकर्प कक्षाचा समावेश नसल्यामुळे तो करुन निविदा प्रक्रिया राबविली. निविदा समितीने दिनांक ०१.०३.२०२४ च्या अंतिम बैठकीत केलेल्या शिफारशी व दिलेले अप्रिभाय विचारात घेऊन सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:

महाराष्ट्र आपत्कालीन वैद्यकिय सेवा प्रकल्पातंर्गत २५५ ॲडव्हान्स लाईफ सर्पोटिंग रुग्णवाहिका (एएलएस) आणि १२७४ बेसीक लाईफ सपोर्टींग रुग्णवाहिका (बीएलएस) अशा एकूण १५२९ रुग्णवाहिका, नवजात अर्भक रुग्णवाहिका-३६, नदी बोट रुग्णवाहिका-१५, समुद्र बोट रुग्णवाहीका-१०, मोटारबाईक रुग्णवाहीका-१६६ या द्वारे १० वर्षाच्या कालावधीकरीता आपत्कालीन प्रतिसाद सेवेसाठी राबविण्यात आलेल्या निविदा प्रक्रियेतील संयुक्त निविदाकार मे.सुमित फॅसिलिटीज लिमिटेड, मे. बी.व्ही.जी. इंडिया लिमिटेड व मे. एसएसजी ट्रान्सपोर्टे सॅनिटेरीयो, एस.एल. यांची सेवा पुरवठादार म्हणून नियुक्ती करण्यास व त्यासाठी होणाऱ्या भांडवली रु. १११६,३७,६४,५९५/-,(अक्षरी रु.अकराशे सोळा कोटी सदतीस लक्ष चौसष्ट हजार पाचशे पंच्याण्णव फक्त) वार्षिक आवर्ती रु.८०७,७७,६३,७५२/-(अक्षरी रु.आठशे सात कोटी सत्त्याहत्तर लक्ष त्रेसष्ट हजार सातशे बावन्न फक्त) व मध्यवर्ती जनसंपर्क कक्षाकरीता (ERC), रु. ९३,८५,७२,०००/- (अक्षरी रु. त्र्यान्नव कोटी पंच्च्याऐंशी लक्ष बहात्तर हजार फक्त) इतक्या रक्कमेच्या खर्चास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. महाराष्ट्र आपत्कालीन वैद्यकिय सेवा प्रकल्पांतर्गत पुरविण्यात येणाऱ्या विविध सेवांचा भांडवली व आवर्ती खर्चाचा तपशिल पुढीलप्रमाणे आहे:-

(रुपये- GST सह)

| अ नु. क्र. | सेवेचा तपशिल | रुग्ण-वाहिका संख्या | प्रति रुग्णवाहिका भांडवली खर्च | एकूण रुग्णवाहिकांचा भांडवली खर्च (अंदाजित) (३ x ४) | भांडवली खर्चाची १० वर्षात विभागाणी केल्यास होणारी रक्कम | आवर्ती खर्च प्रति रुग्ण-वाहिका दर महा | आवर्ती खर्च वार्षिक (७*३*१२) | एकूण बाह्यस्त्रोताद्वारे अपेक्षित वार्षिक खर्च (६+८) |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| १ | आपत्कालीन वैद्यकीय सेवा रुग्णवाहिका | ALS-२५५ | ८४,१६,३५३ | २,१४,६१,७०,०८६ | २१,४६,१७,००९ | ४,१८,०६३ | १,२७,९२,७२,७८० | १,४९,३८,८९,७८९ |
| | | BLS-१२७४ | ६२,८८,८८६ | ८,०१,२०,४०,४५८ | ८०,१२,०४,०४६ | ३,९२,००० | ५,९९,२८,९६,००० | ६,७९,४१,००,०४६ |

| अ नु. क्र. | सेवेचा तपशिल | रुग्ण-वाहिका संख्या | प्रति रुग्णवाहिका भांडवली खर्च | एकूण रुग्णवाहिकांचा भांडवली खर्च (अंदाजित) (३ x ४) | भांडवली खर्चाची १० वर्षात विभागाणी केल्यास होणारी रक्कम | आवर्ती खर्च प्रति रुग्ण-वाहिका दर महा | आवर्ती खर्च वार्षिक (७*३*१२) | एकूण बाह्यस्त्रोताद्वारे अपेक्षित वार्षिक खर्च (६+८) |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| २ | नवजात अर्भक रुग्णवाहिका | ३६ | ९१,१७,७१६ | ३२,८२,३७,७९३ | ३,२८,२३,७७९ | ५,६७,९०२ | २४,५३,३३,५०० | २७,८१,५७,२७९ |
| ३ | नदी बोट रुग्णवाहिका | १५ | १,७५,३४,०७० | २६,३०,११,०४६ | २,६३,०१,१०५ | ७,७५,२३० | १३,९५,४१,४७२ | १६,५८,४२,५७७ |
| ४ | समुद्र बोट रुग्णवाहिका | १० | ३,२०,००,००० | ३२,००,००,००० | ३,२०,००,००० | ८,५०,००० | १०,२०,००,००० | १३,४०,००,००० |
| ५ | मोटार बाईक रुग्णवाहिका | १६६ | ५,६८,१०४ | ९,४३,०५,२११ | ९४,३०,५२१ | १,६०,००० | ३१,८७,२०,००० | ३२,८१,५०,५२१ |
| एकूण | | | | **११,१६,३७,६४,५९५** | **१,११,६३,७६,४६०** | | **८,०७,७७,६३,७५२** | **९,१९,४१,४०,२१२** |
| | मध्यवर्ती संपर्क कक्ष | | | ९३,८५,७२,००० | | | | |

३. सदर प्रशासकीय मान्यता संदर्भाधिन दिनांक ०४/०१/२०२४ रोजी प्रसिध्द करण्यात आलेल्या निविदेतील अटी व शर्तींच्या अधिन राहून देण्यात येत आहे. तरी उक्त सेवा पुरवठादारास कार्यारंभ आदेश देण्याची कार्यवाही आयुक्त, आरोग्य सेवा यांनी सत्वर पूर्ण करावी.

४. यासाठी होणारा आवर्ती खर्च मागणी क्र. आर-१, २२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ८००, इतर खर्च, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना, ०१ किमान गरजा कार्यक्रम (०१) (१०) - ट्रॉमा केअर युनिटची स्थापना - महाराष्ट्र आपत्कालीन वैद्यकीय सेवा, (२२१०४६८९) - १३ - कार्यालयीन खर्च या मुख्य लेखाशिर्षातून चालू आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीतून व भांडवली खर्च मागणी क्र. आर-३ ४२१०,वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च, ०१, नागरी आरोग्य-विषम चिकित्सा, ११०, रुग्णालये व दवाखाने (०१) रुग्णालये व दवाखाने (कार्यक्रम) (४२१०११०१) ५२- यंत्रसामग्री व साधनसामग्री या मुख्य लेखाशिर्षातून चालू आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय मा. मंत्रिमंडळाच्या दि.१३ मार्च, २०२४ च्या बैठकीमध्ये मा. मंत्रीमंडळाने दिलेल्या निर्देशानुसार मा. मुख्यमंत्री यांनी दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१४१७४३५११८८१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHIVDAS MAHADEO DHULE

Digitally signed by SHIVDAS MAHADEO DHULE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=fd353a6a1af02b28757a9a542f2f807ba459543ed19dc809f2f150cfde4470c9, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=55231903025208911890F58514593563E9788A66733F9A7E0D1A454083659841, cn=SHIVDAS MAHADEO DHULE
Date: 2024.03.15 19:16:58 +05'30'

**( शि. म. धुळे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. मा.मुख्यमंत्री, यांचे अप्पर मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
२. मा.मंत्री (सा.आ. व कु.क.),यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
३. महालेखापाल- १ / २, महाराष्ट्र, (लेखा परिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
४. आयुक्त, आरोग्य सेवा व अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
५. सह संचालक, आरोग्य सेवा, (रुग्णालये राज्यस्तर), मुंबई.
६. सह संचालक, आरोग्य सेवा, (खरेदी कक्ष), मुंबई
७. अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, मुंबई.
८. वित्त विभाग (कार्यासन व्यय-१३), मंत्रालय, मुंबई.
९. नियोजन विभाग (कार्यासन-१४७२), मंत्रालय, मुंबई
१०.कक्ष अधिकारी, सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई.
११.निवडनस्ती (कार्यासन आरोग्य-३).